महाराष्ट्र शासन
महिला व बाल विकास विभाग
शासन आदेश क्रमांक : मबाआ- २०१७/प्र.क्र.८९/कार्या-७
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३१ मे, २०१७.

## शासन आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम-२००५ मधील तरतूदी नुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने आणि पदावधी पूर्ण होण्यापूर्वी बदली प्रस्तावित असलेल्या अधिकाऱ्यांच्या बाबतीत उक्त अधिनियमाच्या कलम ४ (१), ४(२) व ४(३) मधील तरतूदीनुसार लगतपूर्व बदली करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्याची पुर्व परवानगी घेऊन खालील अधिका-याची त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय कारणास्तव बदली करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिका-याचे नाव व पद | सध्याचे कार्यरत कार्यालय | बदलीने पदस्थापनेचे कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री. एम. डी. बोरखडे, उपआयुक्त | विभागीय उपआयुक्त, महिला व बाल विकास, कार्यालय, अमरावती | विभागीय उपआयुक्त, महिला व बाल विकास, कार्यालय, नागपूर **अतिरिक्त कार्यभार:-** विभागीय उपआयुक्त,महिला व बाल विकास, कार्यालय, अमरावती |

२. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांना कळविण्यात येते की, वरीलप्रमाणे पदस्थापना देण्यात आलेल्या अधिकाऱ्यांना त्यांचे अधिनस्त पदस्थापनेचे आदेश तात्काळ निर्गमित करावेत. बदली झालेल्या अधिकाऱ्यांना कार्यालय प्रमुखांनी तात्काळ कार्यमुक्त करावे व सदरील अधिकाऱ्यांनी त्यांच्या बदलीच्या पदावर तात्काळ रुजू व्हावे. त्यांचे पुढील वेतन व भत्ते रुजू होणाऱ्या पदावरच काढण्यात येतील याची आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांनी दक्षता घ्यावी.

३. वरीलप्रमाणे पदस्थापना करण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांची पदस्थापना प्रशासकीय कारणास्तव करण्यात येत असल्याने त्यांना बदलीविषयक फायदे अनुज्ञेय राहतील.

४. वरीलप्रमाणे करण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेच्या आदेशासोबत त्यांचे गोपनीय अहवाल, सेवापुस्तक, तसेच अंतिम वेतन प्रमाणपत्र बदली करण्यात आलेल्या नवीन कार्यालयाकडे तात्काळ पाठविण्यात यावे.

५. वरीलप्रमाणे पदस्थापना करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांना पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करु नये वा महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने पदस्थापना झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत.

६. वरीलप्रमाणे पदस्थापना करण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांनी बदली आदेशानुसार तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा राजकीय दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न केल्यास संबंधित अधिकाऱ्यांवर राजकीय दबावाबाबतची ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणुक) नियम १९७९ मधील क्रमांक (३) (३) व क्रमांक २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून त्यांचेविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

७. वरीलप्रमाणे पदस्थापना करण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांना पदस्थापनाने देण्यात येणाऱ्या पदावर रुजू करुन घेताना, ते रजेवर / गैरहजर होते किंवा कसे याबाबतची खातरजमा त्यांना पदस्थापनेवर हजर करुन घेणाऱ्या कार्यालयाने करावी. सदर अधिकारी वैद्यकीय कारणास्तव गैरहजर असतील तर त्यांना हजर करुन घेण्यापूर्वी वैद्यकीय मंडळासमोर पाठवावे. जर अन्य रजेवर होते असे आढळल्यास त्यांचेकडून न चुकता तसा रजेचा अर्ज भरुन घ्यावा आणि नंतर हजर करुन घ्यावे. तसेच रजा संदर्भात शासनाने वेळोवेळी प्रसृत केलेल्या शासन निर्णय/परिपत्रकांतील निदेशांचे पालन करावे.

८. सदरचे आदेश हे शासन निर्णय क्र. मबाविआ/२०१४/प्र.क्र.२७७/का-७ दि.१७.०६.२०१६ अन्वये महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्याचे विनियमन अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करण्याबाबत मा.मंत्री, महिला व बाल विकास विभाग यांना प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

९. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०५३०१६२९४३९२३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2017.05.31 15:51:15 +05'30'

(ला.रा.गुजर)
उप सचिव, महिला व बाल विकास विभाग

**प्रत,**

१) मा.मंत्री (म.व बा.वि), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२) मा.राज्यमंत्री (म.व बा.वि), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३) मा. सचिव(म.व बा.वि),यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक,मुंबई-४०० ०३२.
४) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे,
५) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, कोकण भवन, नवी मुंबई
६) सर्व विभागीय उप आयुक्त, महिला व बाल विकास (आयुक्तालयामार्फत)
७) संबधित जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी (आयुक्तालयामार्फत)
८) महालेखापाल १ / २ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरिक्षा), मुंबई / नागपूर (आयुक्तालयामार्फत)
९) संबंधित अधिदान व लेखाधिकारी / जिल्हा कोषागार अधिकारी (आयुक्तालयामार्फत)
१०) सर्व संबंधित अधिकारी, (आयुक्तालयामार्फत)
११) निवडनस्ती, कार्यासन ७ महिला व बाल विकास विभाग.